शासनाने वितरीत केलेल्या अनुदानापैकी अखर्चित निधी खर्च करण्याबाबत--

**महाराष्ट्र शासन**

**वित्त विभाग,**

**शासन निर्णय क्र: संकिर्ण-१०.२१/प्र.क्र.६३/अर्थोपाय**

मंत्रालय, ( मुख्य इमारत) पाचवा मजला, दालन क्र.५०५,
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दि. २४.०९.२०२१.

वाचा:- १) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण - १०.०२/प्र.क्र.१२८/अर्थोपाय, दि.०६.०६.२००८.

२) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण - १०.१५/प्र.क्र.१८/अर्थोपाय, दि.२५.०८.२०१५.

३) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक संकिर्ण-१०.१७/प्र.क्र.६४/ अर्थोपाय, दि.२१.०९.२०१७.

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाने अर्थसंकल्पिय तरतूदीनुसार एखाद्या आर्थिक वर्षात वितरीत केलेला निधी त्या त्या आर्थिक वर्षात खर्च होणे अपेक्षित असून उर्वरित अखर्चित निधी शासनास समर्पित करणे आवश्यक आहे. तथापि, जिल्हा परिषदा, नगर परिषदा, महानगरपालिका, प्राधिकरणे यांना एखाद्या आर्थिक वर्षात मुक्त केलेला निधी पूर्णपणे खर्च करतांना येणा-या अडचणी लक्षात घेऊन संदर्भाधीन दि.०६.०६.२००८ च्या शासन निर्णयान्वये शासनाने जिल्हा परिषदा, नगर परिषदा, महानगरपालिका, प्राधिकरणे यांना एखाद्या आर्थिक वर्षात मुक्त केलेला व अखर्चित राहीलेला निधी लगतच्या पुढील आर्थिक वर्षअखेर पर्यंत खर्च करण्याची अनुमती दिलेली आहे. मात्र, पुढील एका आर्थिक वर्षापेक्षा जास्त कालावधीसाठी अखर्चित राहीलेला निधी शासनाकडे परत करणे बंधनकारक राहील अशा स्पष्ट सुचना उपरोक्त दि.०६.०६.२००८ च्या शासन निर्णयान्वये देण्यात आल्या आहेत.

तथापि, आर्थिक वर्ष सन २०१९-२० मध्ये मार्च महिन्याच्या शेवटी राज्यात कोरोना महामारीचा प्रादुर्भाव मोठ्या प्रमाणात वाढल्यामुळे स्थानिक स्वराज्य संस्थांना वितरीत करण्यात आलेला निधी पुरेशा प्रमाणात खर्च होऊ शकला नाही. तसेच सन २०२०-२१ मध्येही सुमारे आठ महिन्यांचा कालावधी कोरोना महामारीमध्ये गेला. त्यामुळे निधी खर्च होऊ न शकल्यामुळे कार्यक्रमावरील खर्च (Scheme Expenditure) खाली उपलब्ध करुन देण्यात आलेला निधी तसेच लेखाशीर्ष २५१५ खालील निधी व जिल्हा परिषदा व नगरपालिकांना देण्यात आलेल्या निधीपैकी अखर्चित निधी दि.३१.०३.२०२२ पर्यंत वापरण्यास परवानगी देण्याबाबत विचार करण्यासाठी

मा.उपमुख्यंत्री यांच्या अध्यक्षतेखाली दि.२५.०८.२०२१ रोजी बैठक आयोजित करण्यात आली होती. सदरहू बैठकीत झालेल्या चर्चेनुसार पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे-

**शासन निर्णय :-**

१) जिल्हा परिषदा, नगरपरिषदा, महानगरपालिका, प्राधिकरणे यांना सन २०१९-२० मध्ये वितरीत झालेला पण अखर्चित राहिलेला निधी दि.३१.०३.२०२२ पर्यंत खर्च करण्यास परवानगी देण्यात येत आहे. तथापि,दि.३१.०३.२०१९ रोजी शिल्लक असलेला अखर्चित निधी सदरहू संस्थांनी शासनाकडे त्वरित जमा करणे बंधनकारक राहील.

२) जिल्हा नियोजन समितीमार्फत सन २०२०-२१ मध्ये वितरीत झालेला पण अखर्चित असलेला निधी शासकीय यंत्रणांना दि.३१.०३.२०२२ पर्यंत वापर करण्यास परवानगी देण्यात येत आहे. तथापि, जिल्हानिहाय अखर्चित निधीची माहिती नियोजन विभागाने प्राप्त करुन त्यानुषंगाने वित्त विभागाच्या सहमतीने अखर्चित निधी खर्च करण्यास परवानगी देण्याच्या शासन आदेशात जिल्हानिहाय रक्कम नमूद करणे आवश्यक राहील. तसेच दि.३१.०३.२०२२ रोजी शिल्लक राहिलेला अखर्चित निधी शासनाकडे जमा करणे बंधनकारक राहील.

३) २५१५१२३८ या लेखाशिर्षाखाली सन २०२०-२१ मध्ये वितरित व अखर्चित निधी दि.३१.०३.२०२२ पर्यंत खर्च करण्यास परवानगी देण्यात येत आहे. त्यानंतर शिल्लक राहिलेला अखर्चित निधी शासनाकडे जमा करणे बंधनकारक राहील. तसेच दिनांक ३१.०३.२०२० रोजी अखर्चित असलेला निधी ग्राम विकास विभागाने त्वरित शासनाकडे जमा करणे बंधनकारक राहील.

४) केंद्र पुरस्कृत योजनांचा क्षेत्रिय स्तरावर उपलब्ध करुन दिलेल्या आर्थिक वर्ष २०२०-२१ च्या निधीपैकी अखर्चित निधी विभागांनी विहीत नियम व कार्यपध्दतीनुसार दि. ३१.०३.२०२२ अखेर खर्च करण्याची कार्यवाही करावी.

उपरोक्त निर्णय हा करोना महामारीच्या पार्श्वभूमीवर तात्पुरत्या स्वरुपात घेण्यात आलेला असून दि.३१.०३.२०२१ व तद्नंतर वितरित करण्यात आलेल्या निधी संदर्भात सर्व प्रशासकीय विभागांनी दि. ०६.०६.२००८ च्या शासन निर्णयाप्रमाणे तंतोतंत कार्यवाही करावी.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९२४१२५२१३६६०५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Jayant Balkrishna Kulkarni

Digitally signed by Jayant Balkrishna Kulkarni
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21c6e2b773a3859ca97c27d5f4e1521c3f812fcd1a7cbeac6f9da1018849c0a7, serialNumber=9def0b6a8723e2ed0b4674c8e4a796ef130132f3686de1ae9848aad4de2445e0, cn=Jayant Balkrishna Kulkarni
Date: 2021.09.24 12:52:02 +05'30'

**( ज.बा.कुलकर्णी )**
**शासनाचे उप सचिव, वित्त विभाग**

**प्रति,**

१) अपर मुख्य सचिव / प्रधान सचिव / सचिव (सर्व मंत्रालयीन विभाग).

२) सर्व सह सचिव / उप सचिव/ अवर सचिव / कक्ष अधिकारी, वित्त विभाग / सर्व व्यय कार्यासने.

३) महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.

४) महालेखापाल, महाराष्ट्र - १ (लेखा परिक्षा), मुंबई.

५) महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.

६) महालेखापाल, महाराष्ट्र - २ (लेखा परिक्षा), नागपूर.

७) संचालक, लेखा व कोषागारे.

८) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई / वांद्रे.

९) निवासी लेखा अधिकारी, मुंबई.

१०) निवड नस्ती (अर्थोपाय).